राज्यातील मान्यता प्राप्त सैनिक शाळांमधील अतिरिक्त तुकडयांच्या शिक्षकेत्तर पदांचा आकृतीबंध मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन निर्णय क्रमांक : ईसैशा-२०१९/प्र.क्र.१४०/१९/एसएम-६,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १७ सप्टेंबर, २०२०

वाचा -

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग, क्रमांक इसैशा १०९५/(२७८/९५)/माशि-८, दिनांक २६ सप्टेंबर, १९९५
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग, क्रमांक इसैशा १००१/(१८५/२००१)/माशि-७, दिनांक ५ जुलै, २००२
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग, क्रमांक इसैशा २००६/प्र.क्र.१२३/माशि-७, दिनांक २४ डिसेंबर, २००७

प्रस्तावना :-

राज्यात माध्यमिक व उच्च माध्यमिक स्तरापर्यंत सैनिकी शिक्षण उपलब्ध करुन देण्यासाठी प्रत्येक जिल्हयात एक सैनिकी शिक्षण देणारी शाळा, सन १९९६-९७ पासून उघडण्यास परवानगी देण्याचा निर्णय संदर्भ क्र.१ येथील दि. २६.०९.१९९५ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला असून यासाठी शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांची एकूण ११ पदे मंजूर करण्यात आली आहे. राज्यातील खाजगी सक्षम व स्वयंसेवी व्यवस्थापनामार्फत चालविल्या जाणाऱ्या सैनिकी शाळांमध्ये इयत्ता ११ वी व नैसर्गिक वाढीने पुढील शैक्षणिक वर्षापासून इयत्ता १२ वी च्या वर्गामध्ये शास्त्र शाखेचा अभ्यासक्रम सुरु करण्यास संदर्भ क्र.२ येथील दिनांक ०५ जुलै २००२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून यासाठी शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांची एकूण ११.५ पदे मंजूर करण्यात आली आहे,तसेच संदर्भ क्र.३ येथील दिनांक २४.१२.२००७ रोजीच्या शासन निर्णयान्वये आदिवासी विद्यार्थ्यांना सैनिकी शाळेमध्ये शिक्षण देण्यासाठी राज्यातील सैनिकी शाळांना जोडून जादा तुकडी सुरु करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला आहे. सैनिकी शाळांमधील मंजूर अतिरिक्त तुकडयांसाठी शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचा आकृतीबंध निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

राज्यातील मान्यता प्राप्त शासन अनुदानित सैनिकी शाळामधील अतिरिक्त तुकडयांसाठी शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचा आकृतीबंध खालील नमूद अटीच्या अधिन राहुन मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदांचे नाव | मंजूर पदे | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | प्रयोगशाळा सहायक ( इयत्ता ५ वी ते १० वी या वर्गासाठी अतिरिक्त सर्वसाधारण/आदिवासी तुकडीकरीता) | १ पद. | S-7:21700-69100 |

अटी-१) सदर प्रयोगशाळा सहायकाचे पद प्रयोगशाळा कार्यान्वित असेल तरच अनुज्ञेय असेल.

२) आदिवासी तुकडयांचा खर्च आदिवासी विकास विभागाकडून करण्यात येईल.

३) वित्त विभागाच्या क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ०४.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार पदभरतीचे बंधन असल्यामुळे पद मंजूरीची कार्यवाही पदभरतीचे बंधन उठल्यावर स्वतंत्रपणे करण्यात येईल.

२. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचा अनैपचारिक संदर्भ क्र. १५३/आपुक, दिनांक ०६.०३.२०२० अन्वये वित्त विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेताक २०२००९१७१४४८०६४५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz
Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2020.09.17 14:49:40 +05'30'

(इ. मु. काझी)
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२. मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
३. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, मुंबई
४. मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद, मुंबई
५. सर्व विधान सभा व विधान परिषद सदस्य
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
७. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
८. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
९. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई यांचे स्वीय सहायक
१०. कक्ष अधिकारी, कार्यासन व्यय-५ / कार्यसन आपुक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११. कक्ष अधिकारी, कार्यासन-११, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१२. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१५. सर्व शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद,
१६. निवड नस्ती (एसएम-६)